सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम” (४४०६ ०४९२) या योजनेंतर्गत अभिसरणांतर्गत करावयाच्या पूर्व पावसाळी कामांसाठी निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः- साववि-२०२४/प्र.क्र.१५/फ-११
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः-२८ मार्च, २०२४

वाचाः-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक साववि-२०२३/प्र.क्र.५१/फ-११, दिनांक ०३.०७.२०२३
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक -साववि-२०२२/प्र.क्र.५८/फ-११, दिनांक २८.०७.२०२३
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक साववि-२०२३/प्र.क्र.५१/फ-११, दिनांक ११.०८.२०२३, दिनांक ११.१०.२०२३, दिनांक २३.१०.२०२३, दिनांक १०.११.२०२३ दिनांक ०२.०२.२०२४ व दिनांक १३.०३.२०२४
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४ व दिनांक ०४.०३.२०२४
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.६३/१२००/२०२३-२४, दिनांक २८.०३.२०२४ रोजीचे पत्र.

प्रस्तावनाः-

वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सन २०२३-२४ करीता **“सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)"** या राज्य योजनेंतर्गत रु.१०१७६८.८५ लक्ष इतका निधी (०२-मजूरी अंतर्गत रु.७६३२६.६४ लक्ष + २१-पुरवठा व सामग्री अंतर्गत रु.२५४४२.२१ लक्ष) (सुधारित अंदाज रु.८९०४८.०० लक्ष) अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

०२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दिनांक १२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये वित्तिय वर्ष सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पीय तरतूदीची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२३-

२४ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२३ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच संदर्भाधीन क्रमांक ५ येथील दिनांक ०५.०२.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये निधी वितरीत करण्याबाबत सुचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

०३. संदर्भाधीन क्रमांक ३ येथे नमूद दिनांक २८.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वनीकरण तसेच वन क्षेत्रातील मृद व जलसंधारणाची सर्व कामे ही महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना व वन विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांचे अभिसरण करून घेण्यास व उर्वरित फरकाची रक्कम योजनेंतर्गत उपलब्ध तरतुदीमधून अदा करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या राज्य योजनेंतर्गत करण्यात येणारी कामे सुध्दा अभिसरणांतर्गत करणे आवश्यक आहे. त्यानुसार “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन कार्यक्रम” या योजनेंतर्गत वनिकरणाचा भरगच्च कार्यक्रम या योजनेंतर्गत अभिसरणाव्दारे करावयाच्या पूर्व पावसाळी कामांकरीता रु.१४८८.१५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधीन क्रमांक ६ येथील दिनांक २८.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत “वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम” या योजनेंतर्गत अभिसरणांतर्गत करावयाच्या पूर्व पावसाळी कामांकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात (००)(०६) “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत “वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम”, या योजनांतर्गत अभिसरणाव्दारे

करण्यात येत असलेल्या पूर्व पावसाळी कामांकरीता खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार वन वृत्त/विभाग निहाय निधी वितरित व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| योजनेचे नाव- वनिकरणाचा भरगच्च कार्यक्रम | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | वन वृत्ताचे नाव | वन विभाग | क्षेत्र (हे.आ.) | उद्दिष्ट | पूर्व पावसाळी कामांकरीता एकूण वितरीत करावयाचा निधी (रु. लाखात) |
| | | | | ०२- मजुरी | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | नागपूर | गोंदिया | २०.०० | ८.२४ | ८.२४ |
| ३ | | वर्धा | १०३.०० | १६२.१० | १६२.१० |
| ४ | धुळे | जळगाव | १०.०० | १४.९३ | १४.९३ |
| ५ | | यावल | ३०.०० | ६१.२८ | ६१.२८ |
| ६ | | नंदुरबार | ६४०.०० | १२४१.६० | १२४१.६० |
| | | **एकूण** | **८०३.००** | **१४८८.१५** | **१४८८.१५** |

०२. उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार “सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत ०२-मजुरी या उद्दिष्टांकरीता “वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम” या योजनांतर्गत अभिसरणाव्दारे करण्यात येत असलेल्या पूर्व पावसाळी कामांकरीता एकूण रु.१४८८.१५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी हा संबंधित योजनांतर्गत अभिसरणाव्दारे करण्यात येत असलेल्या पूर्व पावसाळी कामांकरीताच खर्च करण्यात यावा. तसेच सदर अभिसरणांतर्गत पूर्व पावसाळी कामांना निधी वितरीत करतांना वन वृत्त/विभाग निहाय कामांचा तपशिल तपासूनच सदर निधी वितरीत करण्याची कार्यवाही अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाकडून करण्यात यावी.

०३. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी सदर निधी तात्काळ वितरीत करून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. या योजनेंतर्गत करण्यात आलेल्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्यात आली आहे याबाबतची दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय

अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

०४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) हे वर्ष २०२३-२४ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील. सदर निधी वितरीत करतांना करण्यात येत असलेली कामे ही संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दिनांक २८.०७.२०२३ मधील तरतुदी, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचना तसेच सक्षम प्राधिकारी यांनी मान्यता दिलेल्या अंदाजपत्रकानुसार तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्याची खातरजमा प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी करावी. तसेच यापुढे शासनाकडे निधी मागणीचा प्रस्ताव सादर करताना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी उपरोक्त बाबी तपासल्याचे प्रमाणपत्र सोबत जोडावे.

०५. सदर निधी वितरित करण्यापूर्वी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२३-२४ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

०६. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ व ५ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

०७. वन वृत्त/विभाग निहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

०८. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**

**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२ )**
**०२- मजूरी**

०९. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दिनांक १२.०४.२०२३, दिनांक ०४.०३.२०२४ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३३०१२४१४७६९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=223dbaf509e56a22dd8c9d33c199767837144d5824e7011745d9a521fdbedad3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B752370B557D0A3E58B4B069230BC54F6A13D04798D2EE7A3F1C7DCC5655271C, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2024.03.30 12:51:33 +05'30'

**(डॉ. रविकिरण गोवेकर)**
**मुख्य वनसंरक्षक, मंत्रालय**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. निवडनस्ती फ-११